**केंद्र शासनाकडून प्रधानमंत्री आवास योजनेतंर्गत प्राप्त झालेला निधी अमरावती व अकोला महानगरपालिकेस वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रआयो.२०१६/प्र.क्र.७८/गृनिधो-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक: २९ डिसेंबर, २०१६

<u>वाचा -</u> केंद्र शासनाचे पत्र क्र.I-१४०११/१५/२०१६-HFA-४(FTS-१५२५५) दिनांक २९/०९/२०१६.

<u>प्रस्तावना -</u>

प्रधानमंत्री आवास योजनेतंर्गत राज्यातील एकूण १३ शहरांकरिता रूपये.३७१.५८ कोटी इतका निधी केंद्र शासनाकडून उपरोक्त संदर्भीय पत्रान्वये प्राप्त झाला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रीत निधिमध्ये जमा झालेला आहे. यापैकी अकोला महानगरपालिकेस रुपये ७.४४६ कोटी व अमरावती महानगरपालिकेस रू.३६.९४८ कोटी केंद्र शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर निधी संबंधित महानगरपालिकेस वितरित करण्याकरिता सुकाणू अभिकरणास (म्हाडा) उपलब्ध करून देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रधानमंत्री आवास योजने अंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या रु.३७१.५८ कोटी निधीपैकी अकोला महानगरपालिकेस रुपये ७.४४६ कोटी व अमरावती महानगरपालिकेस रूपये ३६.९४८ कोटी इतका निधी राज्यस्तरीय मान्यता व संनियंत्रण समिती व केंद्रीय मान्यता व संनियंत्रण समिती यांनी नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून सुकाणु अभिकरणास(म्हाडा) निधी वितरीत करण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. सदर निधीच्या उपयोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सुकाणु अभिकरणास सादर करण्याची दक्षता संबंधित महानगरपालिका यांनी घ्यावी.

या प्रयोजनावर होणारा खर्च मागणी क्र.क्यू-३, मुख्य लेखाशीर्ष २२१६, गृहनिर्माण, ८०-सर्वसाधारण, १०३ गृहनिर्माण मंडळे इत्यादींना सहाय्य (०८) सर्वांसाठी घरे (०८) (०१) सर्वांसाठी घरे-अंमलबजावणी यंत्रणा सहायक अनुदाने केंद्र हिस्सा (६०%) ३१ सहायक अनुदाने (वेतनत्तर) या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं.-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३/ दि.-२०.४.२०१६ मधील परिच्छेद-१८ नुसार विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२९१५४८००००९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sarjerao Shankar Jagdale

Digitally signed by Sarjerao Shankar Jagdale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sarjerao Shankar Jagdale
Date: 2016.12.29 15:50:48 +05'30'

**(स.शं.जगदाळे)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, (पत्राने)
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
३. मा.मंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई-३२.
४. मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई-३२.
५. मा.विरोधी पक्षनेता,महाराष्ट्र विधान सभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधान भवन, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता,महाराष्ट्र विधान परिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
७. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन,मंत्रालय, मुंबई-३२.
८. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
९. आयुक्त, अकोला व अमरावती महानगरपालिका.
१०. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, मुंबई.
११. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखापरीक्षा,नागपूर.
१२.कोषागार अधिकारी, अकोला व अमरावती.
१३.उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३ कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
१४.सह सचिव भारत सरकार, आवास आणि शहरी गरिबी उपशमन मंत्रालय, निर्माण भवन, नवी दिल्ली -११००११(नोंदणीकृत डाकेने)
१५. सह संचालक, लेखा व कोषागरे कॉम्प्युटर सेल, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला मंत्रालयासमोर, मुंबई.
१६. निवडनस्ती/गृनिधो-२ (सेल) कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.